**महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा**
**गट-अ, स्त्री रोग तज्ञ**
**संवर्गात नामनिर्देशनाने नियुक्तीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्र.पदोन्न-११०९/प्र.क्र.६५/सेवा-२**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक :- १ एप्रिल, २०११.**

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट- अ (वेतनश्रेणी रु.१५६००-३९१०० + ग्रेड पे ५४००) या संवर्गातील वैद्यकीय अधिकारी, गट अ मधील स्त्री रोग तज्ञ संवर्गात पदोन्नतीच्या वाटयावरील पदावर पदोन्नती देण्यास पात्र ठरलेल्या उमेदवारांना सोबतच्या **विवरणपत्र अ** मध्ये दर्शविल्याप्रमाणे रकाना २ येथील उमेदवारास रकाना ३ येथील प्रवर्गा मधील रिक्त पदासाठी महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट- अ (वेतनश्रेणी रु.१५६००- ३९१०० + ग्रेड पे ६६००) या संवर्गात वैद्यकीय अधिकारी, **(स्त्री रोग तज्ञ),** गट अ मधील रकाना क्र. ४ येथील पदावर करण्यात येत आहे.

२. प्रस्तुत पदोन्नती, महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट -अ, स्त्री रोग तज्ञ संवर्गातील पदांच्या सेवाप्रवेश नियमातील तरतुदीनुसार करण्यात आली आहे. तसेच सदर पदोन्नती मा. उच्च न्यायालय, मुंबई प्रलंबित याचिका क्र. ८४५२/०४ मधील मा. उच्च न्यायालयाच्या अंतिम निर्णयाच्या अधिन राहून देण्यात येत आहेत.

३. प्रस्तुत पदोन्नतीनंतर संबंधित वैद्यकीय अधिकाऱ्यांची पदस्थापना सोबत जोडलेल्या विवरण पत्र अ मधील स्तंभ ४ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

४. सोबत जोडलेल्या विवरण पत्र अ मधील जे अधिकारी अनुसूचित जाती या प्रवर्गाचे आहेत व अद्याप ज्यांनी जात पडतळणी वैधता प्रमाणपत्र सादर केलेले नाही अशा अधिकाऱ्यांना देण्यात आलेल्या पदोन्नत्या जात पडताळणी वैधता प्रमाणपत्र ३ महिन्याच्या आत सादर करण्याच्या अधिनतेने देण्यात येत आहेत. या अधिकाऱ्यांनी त्यांच्या जात प्रमाणपत्राची वैधता शासनास विहित कालमर्यादेत सादर न केल्यास त्यांना देण्यात यआलेल्या पदोन्नत्या रदद करण्यात येतील.

५. विवरण पत्र अ मधील जे अधिकारी अ.ज. प्रवर्गाचे आहेत व ज्यांनी वैधता प्रमाणपत्र सादर केलेले नाही अशा अधिकाऱ्यांना पदोन्नती देण्यात येणार नाही. विवरण

पत्रातील अशा अधिकाऱ्यांना पदोन्नती नंतरची पदस्थापना देण्यात येणार नाही याची दक्षता संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांनी घ्यावी.

६. सदर अधिकाऱ्याचे पदोन्नतीनंतरचे वेतन महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ नुसार निश्चित करण्यात यावे.

७. पदोन्नतीनंतर पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्याकरीता तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे. व त्या अनुषंगाने सदर अधिकाऱ्यांना कार्यमुक्त केल्यानंतर नवीन पदस्थापनेवर आदेश प्राप्त झालेल्या दिनांकापासून एक महिन्याचे आत हजर व्हावे अन्यथा ते पदोन्नतीस इच्छूक नाहीत ते गृहीत धरुन त्यांची पदोन्नती रदद करण्यात येईल. या प्रकरणी संबंधित उपसंचालक यांनी संबंधित अधिकाऱ्यांना कार्यमुक्त केल्यानंतर नवीन पदस्थापनेवर वेळीच हजर होतात किंवा नाही याबाबता अनुपालन अहवाल विहित कालमर्यादेत संचालक, आरोग्य सेवा व शासनास सादर करावा.

८. प्रस्तुत आदेश, साामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३७२/११/१२, दि. ०८.०३.२०११ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. आवश्यक अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रात प्रसिध्द करण्यात यावी.

सदरचे आदेश www.maharashtra.gov.in वर साकेतांक क्र. येथे प्रसिध्द करण्यात आले आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(राजेंद्र पवार)**
**शासनाचे अवर सचिव**

प्रति,

विभागीय आयुक्त
संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
सहसंचालक (प्रशासन व अर्थसंकल्प), आरोग्य सेवा, मुंबई
उपसंचालक, आरोग्य सेवा, (सर्व मंडळे)
जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय, (संबंधित)
वैद्यकीय अधिक्षक, विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय/ उपजिल्हा/ कुटीर/ ग्रामीण रुग्णालय, संबंधित
महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, (संबंधित)
संबंधित अधिकारी (विवरण पत्र अ मधील रकाना २ प्रमाणे)
निवडनस्ती, सेवा-२

| विवरण पत्र अ | | | |
|---|---|---|---|
| शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग क्र. पदोन्न-११०९/प्र.क्र. ६५/सेवा-२, दि. ०१ एप्रिल, २०११ चे जोडपत्र | | | |
| ंस्त्री रोग तज्ञ या संवर्गातील पदावर नियुक्तीसाठी शिफारस करण्यांत आलेल्या उमेदवारांना पदस्थापना - पदोन्नतीने नियुक्ती | | | |
| **अ.क्र.** | **उमेदवाराचे नाव** | **निवडीचा प्रवर्ग** | **प्रस्तावित पदस्थापना** |
| १ | डॉ. कविता स. सोनटक्के | खुला | सामाय रुग्णालय, जळगाव |
| २ | डॉ. सी.जी.बस्तेवार | अ.ज. | सामाय रुग्णालय, वर्धा |
| ३ | डॉ. डि.डि.लोखंडे | खुला | सामाय रुग्णालय, मालेगांव,जि. नाशिक |
| ४ | डॉ. टि.एस.गच्छे | अ.जा. | स्त्री रुग्णालय, परभणी |
| ५ | डॉ. ऐ.एस.सावंत | अ.जा. | सामाय रुग्णालय, रायगड |
| ६ | डॉ. अे. डी. दिवेकर | खुला | सामाय रुग्णालय, सिंधुदुर्ग |
| ७ | डॉ. आर.एस.जोशी | खुला | सामाय रुग्णालय, रतागिरी |
| ८ | डॉ. चंद्रकांत एच.माने | खुला | सामाय रुग्णालय, ठाणे |
| ९ | डॉ. कुमुदीनी. उमाळे | खुला | स्त्री रुग्णालय, अमरावती |
| १० | डॉ. अे.बी. भोसले | खुला | सामाय रुग्णालय, नाशिक |
| ११ | डॉ. अरविंद आर. गायकवाड | खुला | सामाय रुग्णालय, उस्माााबाद |
| १२ | डॉ. आर.एल. काळपांडे | खुला | सामाय रुग्णालय, खामगांव, जि. बुलढाणा |
| १३ | डॉ. पी.आर.पुरी | वि.जा. (अ) | सामाय रुग्णालय, बीड |
| १४ | डॉ. एस. के.मुंडे | भ.ज. (क) | स्त्री रुग्णालय, जालना |